विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज या संस्थेकरीता २१ सुरक्षा रक्षकांची सेवा महाराष्ट्र राज्य सुरक्षा रक्षक महामंडळ (एम. एस. एफ.) या संस्थेकडून सेवा घेण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुरक्षा ०१२५/प्र.क्र.०९/प्रशासन-२

९ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग,
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख : ०२ एप्रिल, २०२५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांकः एसजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दिनांक ०८.११.२००६.

२) शासन अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांकः एसजीए-२०१४/प्र.क्र.३००(२) /कामगार-५, दिनांक ३०.०७.२०१४.

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

४) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. संवैशिवसं/शावैममिरज/ बाह्यस्त्रोत/सुरक्षारक्षक/१०३८/२०२५, दिनांक ०५.०२.२०२५.

**प्रस्तावना :-**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज येथील विद्यार्थी, वैद्यकीय अधिकारी, कर्मचारी, यंत्र सामुग्री, फर्निचर व इतर वस्तुंच्या सुरक्षेच्या दृष्टीने २१ सुरक्षा रक्षकांच्या सेवा महाराष्ट्र राज्य सुरक्षा रक्षक महामंडळ (एम. एस. एफ.) यांच्याकडून घेण्याचा प्रस्ताव आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांनी संदर्भ क्र. ४ वरील पत्रान्वये शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज येथे २१ सुरक्षा रक्षकांची सेवा घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज येथील विद्यार्थी, वैद्यकीय अधिकारी, कर्मचारी, यंत्र सामुग्री, फर्निचर व इतर वस्तुंच्या सुरक्षेच्या दृष्टीने २१ सुरक्षा रक्षक खालील नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्य सुरक्षा रक्षक महामंडळ (एम. एस. एफ.) या सेवा पुरवठादाराकडून उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता येणाऱ्या

रु.८३,२६,०८०/- (जी. एस. टी. सह) (रुपये त्र्याअंशी लाख सव्वीस हजार अंशी फक्त) इतक्या खर्चास तसेच एक महिन्याची अनामत रक्कम व तीन महिन्याची सुरक्षा ठेव जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| पदनाम | आवश्यक पदसंख्या | एका पदाकरिता येणारा मासिक खर्च रुपये | एकुण पदांकरिता येणारा मासिक खर्च रुपये | एकुण पदांकरिता येणारा वार्षीक खर्च रुपये |
|---|---|---|---|---|
| सुरक्षा रक्षक | २१ | २८००० | ५८८००० | ७०५६००० |
| एकुण | २१ | | ५८८००० | ७०५६००० |
| | | | १८% जी. एस. टी. | १२७००८० |
| | | | (१८% जी. एस. टी. सह) एकुण | ८३२६०८० |

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -४, अ.क्र. ११ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर सुरक्षा सेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेच्या (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध अर्थसंकल्पीत निधी मधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०२१५३०५०३११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.04.02 15:48:50 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.

४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सुरक्षा रक्षक महामंडळ (एम. एस. एफ.), ३२ वा मजला, सेंटर १, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई-४००००५.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
७. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज.
८. निवडनस्ती (प्रशा-२)